**महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद सदस्यांचे वेतन व भत्ते तसेच त्यांच्या स्वीय सहायकांचे पारिश्रमिक आहरण करण्याच्या पध्दतीत सुधारणा.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- १०१५/प्र. क्र.१३ /कोषा प्र - ५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

तारीख: २० फेब्रुवारी, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्र.टीआरडब्ल्यु-१३८१/प्र.क्र.३६५/८९/कोषागार-४ दि.१८/१०/१९८९.**

२) **महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ज्ञापन क्र.म.वि.स./२८९२८/ह, दि.२०/११/२०१४.**

प्रस्तावना -

वित्त विभाग, शासन निर्णय क्र.टीआरडब्ल्यु-१३८१/प्र.क्र.३६५/८९/कोषागार-४, दि.१८/१०/१९८९ अनुसार राजपत्रित अधिका-यांच्या वेतन आहरण करण्याच्या पध्दतीत सुधारणा करण्यात आली आहे. मात्र ही सुधारणा शासन निर्णयाच्या परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या संवर्गातील पदाधिका-यांना लागू करण्यात आली नसल्याने राज्यमंत्र्यांसह सर्व मंत्री आणि विधानसभा/विधानपरिषद यांचे अध्यक्ष/सभापती, उपाध्यक्ष/उपसभापती व सदस्य यांचे वेतन व भत्ते सद्याच्या प्रचलित पध्दतीनुसारच काढण्याचा निर्णय त्यावेळी झाला आहे. महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद सदस्यांचे वेतन व भत्ते तसेच त्यांच्या स्वीय सहायकांचे पारिश्रमिक ECS/EFT व्दारा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयामार्फत अदा करण्याची कार्यपध्दती सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याअनुषंगाने महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाने संदर्भाधीन २ येथील ज्ञापनान्वये अवर सचिव स्तरावरील अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित केले आहे. यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय-**

१. पिठासीन अधिकारी, विरोधी पक्षनेते व सर्व विधानमंडळ सदस्यांचे वेतन व भत्ते यासंबंधीची देयके तसेच त्यांच्या स्वीय सहाय्यकांचे वेतन/पारिश्रमिकांची देयके महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रित अधिका-यांच्या देयकाप्रमाणे (महाराष्ट्र कोषागार नियम १९ नमूना) एकत्रितरित्या विधानमंडळ सचिवालयाकडून अधिदान व लेखा कार्यालय,मुंबई येथे दाखल केली जातील.

२. सदर देयके अधिदान व लेखा कार्यालयाकडून पारित करुन रक्कम प्रथम ECS व्दारे महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांच्या खात्यात जमा करुन सदर रक्कम थेट संबंधिताच्या बँक खात्यात NEFT/ECS पध्दतीव्दारे जमा करण्यात येईल.

३. पिठासीन अधिकारी व विरोधी पक्षनेते व महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य यांचे वेतन व भत्ते तसेच त्यांच्या सहायकांचे वेतन/पारिश्रामिक आहरित करण्यासाठी ते स्वत: आहरण व संवितरण अधिकारी म्हणून यापुढे कार्यरत राहणार नाहीत.

४. वैद्यकीय प्रतिपूर्तीबाबत या अगोदर अस्तित्वात असलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात येईल व यासाठी पिठासीन अधिकारी व विरोधी पक्षनेते व सदस्य स्वत: आहरण व संवितरण अधिकारी म्हणून कार्यरत राहतील. तसेच प्रवास देयकाच्या बाबतीत यापूर्वीचीच कार्यपध्दती कायम राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२०१६२४५२५८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN BHASKAR RINGANE

Digitally signed by NARAYAN BHASKAR RINGANE
DN: CN = NARAYAN BHASKAR RINGANE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2015.02.20 16:52:41 +05'30'

**( ना.भा.रिंगणे )**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

२.सर्व सन्मानिय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,

३.राज्यपालांचे सचिव

४.मुख्यमंत्र्यांचे सचिव

५.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग

७.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख

८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई

९.प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८.मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्र.५